**स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत निधीतून "मराठवाडा मुक्ती संग्राम" या विषयावरील माहितीपटाची निर्मिती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२३/प्र.क.८६/सां.का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ ऑगस्ट, २०२३

**वाचा :** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र.संकीर्ण-८२२१/प्र.क्र.१७४/ सां.का.४, दि. २८.०९.२०२१
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे क्र.संकीर्ण-८२२२/प्र.क्र.४१३/ सां.का.४, दि. १७.०२.२०२३ चे पत्र
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे क्र.संकीर्ण-८२२३/प्र.क्र.२६७/ सां.का.४, दि. ०१.०८.२०२३ चे पत्र
४) मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित यांचे क्र.संकीर्ण-२०२३/म.मु.सं./ज.वि./२७/४५९, दि.०२.०८.२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना :**

भारतीय स्वातंत्र्याला ७५ वर्षे पूर्ण होत असल्याच्या पार्श्वभूमीवर स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवाच्या प्रभावी व यशस्वी अंमलबजावणीसाठी संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयाअन्वये विविध समित्या गठीत करण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार मा. मंत्री सांस्कृतिक कार्य यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या कोअर समितीच्या दिनांक ५.१२.२०२२ रोजी झालेल्या बैठकीत विविध कार्यक्रमाबरोबरच, मराठवाडा मुक्ती संग्राम अमृत महोत्सवानिमित्त विविध कार्यक्रम व उपक्रम राबविण्याचा व त्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्याबाबतचे इतिवृत्त संदर्भ क्रमांक २ च्या पत्राअन्वये निर्गमित करण्यात आले आहे.

२. तदनंतर स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवाच्या आयोजनासाठी मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांच्या अध्यक्षतेखाली दि.१५ जुलै, २०२३ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त संदर्भ क्रमांक ३ येथील शासन पत्रान्वये प्राप्त झाले असून सदर इतिवृत्ताअन्वये मराठवाडा मुक्ती संग्रामावर आधारित डॉक्युमेंटरी तयार करण्याचे काम महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव, मुंबई यांच्यामार्फत करण्याचे निर्देशित केले आहे.

३. त्यानुसार महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांनी सदर माहितीपटाची निर्मिती करण्यासाठी संस्थेची निवड करण्याकरीता वृत्तपत्रांमध्ये जाहिरात दिली होती. महामंडळाकडे जाहिरातीस अनुसरुन प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी करण्यासाठी गठीत केलेल्या समितीने संकल्पना, संहिता, ऐतिहासिक अनुभव व खर्चाचे विवरण याआधारे मे.दीठी प्रोडक्शन निर्मिती संस्था, पुणे यांची निवड केली असून माहितीपट निर्मिती करण्यासाठी येणाऱ्या रु.१,५२,३३,५०५/- इतक्या खर्चाचा प्रस्ताव महामंडळाने शासनाच्या मान्यतेसाठी संदर्भ क्रमांक ४ च्या

पत्राअन्वये सादर केला आहे. त्यानुसार सदर माहितीपटाची निर्मिती करण्यासाठी व त्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने मराठवाडा मुक्ती संग्राम विषयक माहितीपटाची निर्मिती मे.दीठी प्रोडक्शन निर्मिती संस्था, पुणे यांच्याकडून करण्याकरीता येणाऱ्या रु.१,५२,३३,५०५/- (अक्षरी रुपये एक कोटी बावन्न लाख तेहतीस हजार पाचशे पाच फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर माहितीपट तयार करण्यासाठी महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई हे समन्वय यंत्रणा म्हणून राहतील व याकरीता निधीचे वितरण महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांना करण्यात येईल.

**२.** सदर कामावरील खर्च "मागणी क्र झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, १०२ कला व संस्कृती प्रचालन, (१३) स्वांतत्र्याचा अमृत महोत्सव (१३) (०१) स्वांतत्र्याच्या अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ ३७३३), ५०, इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ अन्वये निर्गमित केलेल्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-तीन, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्र.२७(२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०८१७१०२८०५३३२३ आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.08.18 14:48:07 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव, मुंबई
३. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई
४. महालेखापाल, (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र/१, मुंबई
५. महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र/१, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

८. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई

९. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर

१०. कार्यकारी संपादक आणि सचिव, दर्शनिका विभाग

११. उप सचिव / कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई - (यांना आदेशात नमूद करण्यात आलेल्या नियंत्रक अधिकारी यांच्याकडे निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह)

१२. उप सचिव / कक्ष अधिकारी (सां.का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - (यांना वित्तीय मान्यता देण्याच्या विनंतीसह)

१३. मे.दीठी प्रोडक्शन, पुणे ( महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित यांच्यामार्फत )

१४. निवडनस्ती (सां.का.१).